**महाराष्ट्र शासनाकडून निर्गमित होणारे शासन आदेश महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई यांना पृष्ठांकित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण १०१०/प्र.क्र.२/१०/१८ (र.व का)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ७ मे, २०१०.

**प रि प त्र क**

महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई हे महाराष्ट्र राज्य महिला आयोग हे महाराष्ट्र राज्य महिला आयोग कायदा १९९३ नुसार स्त्रियांच्या संदर्भात हमी देण्यात आलेले मूलभूत हक्क मिळवून देण्यास चालना देण्याच्या उद्देशाने आणि स्त्रियांचा समाजातील दर्जा आणि प्रतिष्ठा सुधारण्यासाठी शासनास शिफारशी करण्याकरिता स्थापित झालेले आहे.

महिलांसाठी तरतूद करण्यात आलेल्या सांविधानिक व कायदेशीर संरक्षक उपाययोजनांशी लक्ष ठेवण्यासाठी आणि राज्य शासनाला प्रभावी संरक्षक उपाययोजना सूचविण्यासाठी तसेच महिलांचे कल्याण व हक्क या संबंधीच्या तरतुदींचा आढावा घेवून सुधारणा सूचविण्यासाठी आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. त्या आयोगाला शासनाची परिपत्रके व आदेश, शासन निर्णय पृष्ठांकीत केली जात नाहीत, असे त्या आयोगाने शासनाच्या निदर्शनास आणले आहे. परिणामी, शासनाने निर्गमित केलेली परिपत्रके, शासन निर्णय, अधिसूचना इत्यादीची महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई यांना करण्यात यावे. महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई हे राज्य शासनाच्या नियंत्रणाखाली असल्यामुळे शासनाची ध्येय धोरणे, योजना इत्यादीची माहिती महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई यांना माहीत असणे आवश्यक आहे. तरी विविध विभागामार्फत निर्गमित करण्यात येणारे ध्येय धोरणे व इतर महत्त्वाच्या बाबीविषयक आदेशाच्या प्रती महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई यांना पृष्ठांकीत करण्याच्या सूचना या परिपत्रकान्वये सर्व मंत्रालयीन विभागांना देण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००५१०२१०४५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( मा. सु. मुळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.

(कृ.मा.प.

मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
शासनाचे मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा,मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय,
*सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
*मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती,

---

*पत्राने